**महाराष्ट्राचे माजी मुख्यमंत्री कै.वसंतराव नाईक यांची जयंती राज्यात दिनांक १ जुलै,२०११ रोजी <u>कृषि दिन म्हणून साजरा करणेबाबत...</u>**

**महाराष्ट्र शासन**

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक : कृषिदि ३८११/प्र.क्र. १२७/३-अे,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक २२ जून २०११

**संदर्भ :-** शासन निर्णय,कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

१) संकीर्ण-१०८९/प्र.क्र.३८/१२ अे, दिनांक २१ जून,१९८९
२) कृषिदि ३८०९/प्र.क्र.१२३/३ अे, दिनांक १२ जून,२००९
३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. जा.क्र.शेमासे/आस्था/कृषीदिन/२०५/२०११,दिनांक ७ जून,२०११

**<u>प्रस्तावना :-</u>**

महाराष्ट्राचे माजी मुख्यमंत्री कै.श्री. वसंतराव नाईक यांनी कृषि क्षेत्रात केलेली भरीव कामगिरी लक्षात घेवून त्यांची जंयती दिनांक १ जुलै रोजी राज्यात ''कृषि दिन'' म्हणून साजरी करण्याचा निर्णय शासनाने संदर्भाधिन क्रमांक १ शासन आदेशान्वये घेतला आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

दिनांक १ जुलै,२०११ रोजी राज्यात प्रतिवर्षी प्रमाणे कृषि दिन म्हणून साजरा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. कृषि दिना निमित्त प्रत्येक पंचायत समितीकरीता जास्तीत जास्त रु.१५००/- (रु.एक हजार पाचशे मात्र) यानुसार ३५१ पंचायत समित्याकरीता रु.५,२६,५००/- (रु. पाच लक्ष सव्वीस हजार पाचशे मात्र) तसेच जिल्हा परिषद मुख्यालयी कृषि दिन साजरा करण्यासाठी प्रत्येक जिल्हा परिषदेकरीता रु.२०००/- (रु. दोन हजार मात्र) या प्रमाणे एकूण ३३ जिल्हा परिषदांकरीता रु.६६,०००/- अशा एकूण रु.५,९२,५००/- (रु. पाच लाख ब्याण्णव हजार पाचशे मात्र) एवढया खर्चास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

२. कृषि दिन साजरा करण्याबाबत मार्गदर्शक सूचना आयुक्त,(कृषि),महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी संबंधितांना दयाव्यात. कृषि आयुक्तांनी दिलेल्या मार्गदर्शक सूचनांतील बाबींवर सदर खर्च करण्यात यावा. तसेच चित्रफिती दाखविणे,शेतक-यांसाठी चहा पाणी,जिल्हा परिषद स्तरावर छोटेसे प्रदर्शन इत्यादी खर्च आणि मंडप,हारतुरे,फोटो वगैरे आवश्यक बाबीकरीता खर्च करण्यात यावा.

३. या प्रित्यर्थ येणारा खर्च जिल्हा परिषद सेस फंडातील उपलब्ध असलेल्या अनुदानातून करण्यात यावा. हा खर्च भागविण्याकरीता सर्व जिल्हयातील मुख्य कार्यकारी अधिकारी व कृषि अधिकारी यांनी जिल्हा सेस फंडातून खर्च करण्याकरीता आयुक्त,(कृषि) यांनी दिलेल्या मार्गदर्शक सूचनेनुसार कार्यवाही करावी. या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीची जबाबदारी आयुकत (कृषि),महाराष्ट्र राज्य,पुणे यांची राहील.

४. हा शासन निर्णय प्रधान सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०११०६२२१४२४५४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(श्री. वि. जाधव)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा.मुख्यमंत्र्याचे सचिव
मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव
सर्व कृषि विद्यापिठांचे कुलगुरु
कृषि आयुक्त,महाराष्ट्र राज्य,पुणे
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ अकोला
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र कृषि उदयोग विकास महामंडळ,मुंबई
महासंचालक,माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य,मुंबई प्रसिध्दीच्या विनंतीसह (५ प्रती)
महालेखाकार १/२,मुंबई/नागपूर
सर्व विधानमंडळ सदस्य,महाराष्ट्र विधानमंडळ / विधानमंडळ ग्रंथालय (१० प्रतीसह)
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हयाचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व विभागीय आयुक्त
संचालक (विस्तार व प्रशिक्षण),महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व संचालक,कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व कृषि सहसंचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व विभागीय कृषि सहसंचालक
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
सर्व तालुका कृषि अधिकारी
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
सर्व सहसचिव /उपसचिव,कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.३२
वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर
वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
निवड नस्ती ३ अे.